उप अभियंता (स्थापत्य) यांची
बदली / पदस्थापना

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन आदेश क्रमांकः एलटीएस २०१७/प्र.क्र.७ /सेवा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १४.०३.२०१७

**शासन आदेश**

श्री. गुणाजी महादेव गांवकर, उप अभियंता (स्थापत्य) यांच्या सेवा महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाने सार्वजनिक बांधकाम विभागास प्रत्यावर्तीत केल्याने श्री. गांवकर हे पदस्थापनेविना आहेत. महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन व शासकीय कर्तव्य पार पाडताना होण्याऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार व सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने, सार्वजनिक सेवेच्या हितार्थ, प्रशासकीय कारणास्तव श्री. गुणाजी महादेव गांवकर, उप अभियंता (स्थापत्य) (पदस्थापनेविना) यांची पदस्थापना जि.प. (बांध.) उप विभाग, आमगांव या रिक्त पदावर करण्यात येत आहे.

२. संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी श्री. गुणाजी महादेव गांवकर, उप अभियंता (स्थापत्य) यांना नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ रुजू होण्यास सांगावे.

३. श्री. गांवकर यांनी त्यांच्या नवीन पदाचा कार्यभार त्वरीत स्वीकारावा, त्यांनी अनधिकृतरित्या गैरहजर राहू नये अन्यथा त्यांची अनुपस्थिती अनधिकृत गैरहजेरी म्हणून समजण्यात येईल व विनावेतन करण्यात येईल, तसेच त्यांच्या सेवेत खंड पडण्याची शक्यता देखील नाकारता येत नाही, याची जाणीव त्यांना करुन देण्यात येत आहे. तसेच त्यांचे लक्ष शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.सीडीआर-१०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ कडे वेधण्यात येत आहे. सदर परिपत्रकान्वये दिलेल्या सूचना लक्षात घेता, त्यांना देण्यात आलेली पदस्थापना रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र ठरतील याचीही त्यांनी नोंद घ्यावी.

४. संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी पदमोचन अधिकाऱ्यांनी पदभार स्वीकारल्याचा दिनांक त्वरीत शासनास कळवावा. विहीत कालावधीत संबंधित अधिकारी बदलीचे ठिकाणी रुजू न झाल्यास, त्याबाबत शासनास त्वरित अवगत करण्यात यावे, जेणे करुन संबंधितांविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई त्वरित करणे शक्य होईल. म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील नियम ३० (सी) नुसार पदस्थापना देण्यात आलेल्या अधिकाऱ्याचा रजेचा अर्ज स्वीकारु नये/ मंजूर करु नये.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३१४१७३२२५६९१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Arvind J Kamble

Digitally signed by Arvind J Kamble
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c7145f142d7f8e597c7957f95eeba7e16ac871e58cfc3b203f7c1273111cfb15, cn=Arvind J Kamble
Date: 2017.03.14 17:33:14 +05'30'

**(अ.ज. कांबळे)**
कार्यासन अधिकारी

**प्रत,**

१. महालेखापाल, १ / २ ( लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य , मुंबई/नागपूर.
२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई/नागपूर
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, गोंदिया.
४. जिल्हा कोषागार अधिकारी गोंदिया.
५. श्री. गुणाजी महादेव गांवकर, उप अभियंता यांना मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांच्या मार्फत.
६. खाजगी सचिव, मा. मंत्री (सा. बां.) (सार्वजनिक उपक्रम वगळून) /मा.मंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम)/ मा.राज्यमंत्री (सा. बां.) (सार्वजनिक उपक्रम वगळून)/मा. राज्यमंत्री (सा.बां.), (सार्वजनिक उपक्रम), मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव (सा.बां.वि.)/सचिव (बांधकामे / रस्ते) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय मुंबई.
८. निवडनस्ती, सार्वजनिक बांधकाम विभाग, सेवा-२.